१२ जून या आंतरराष्ट्रीय बालकामगार विरोधी दिनानिमित्त बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्यासंबंधी वृत्तपत्रांनी दिलेल्या जाहिरातीच्या खर्चास प्रशासकीय व कार्योत्तर मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीएलए-२०२१/प्र.क्र.१५७(भाग-१)/कामगार-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ११ मार्च, २०२२.

वाचा:- १) शासन पत्र क्र.सीएलए-२०२१/प्र.क्र.१५७/कामगार-४, दि.११.०६.२०२१.
२) कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.काआ/बाका/जाहिरात/१२जुन/२०२१-२२/कार्या-१२/ ५५६, दि.२५ ऑगस्ट,२०२१.
३) ॲड-वे डिझाईन,पुणे/कोल्हापूर यांचे दि.१९.१२.२०२१ रोजीचे देयक.

**प्रस्तावना :-**

बाल व किशोरवयीन कामगार (प्रतिबंध व नियमन) अधिनियम, १९८६ या कायद्याची प्रभावी अंमलबजावणी करणे, यासाठी जाहिरात व प्रसिद्धीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहचविणे आणि जन सहभागातूनच बाल कामगार ही अनिष्ट प्रथा नष्ट करणे या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रसार व प्रसिद्धी करुन प्रभावी अंमलबजावणी करण्याचे कार्य कामगार विभागाकडून करण्यात येते. त्यानुषंगाने, दि.१२ जुन हा आंतराष्ट्रीय बाल कामगार विरोधी दिनाचे औचित्य साधुन बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्यासाठी निवडक १२ मराठी दैनिक वर्तमानपत्रामध्ये १२ जुन आंतरराष्ट्रीय बालकामगारविरोधी दिननिमित्त रंगीत जाहिरात प्रसिद्ध करण्याबाबत मा.मंत्री(कामगार) यांनी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांना दि.११.०६.२०२१ रोजीच्या पत्रांन्वये कळविण्यात आले होते. त्यानुसार, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांच्यामार्फत सदर जाहिरात १२ वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर जाहिरातीची देयके अदा करण्याबाबतचा प्रस्ताव कामगार आयुक्त कार्यालयाकडून शासनास सादर केला आहे. त्यानुसार, सदर जाहिरातीची देयके अदा करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय व कार्योत्तर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१२ जून या आंतरराष्ट्रीय बालकामगार विरोधी दिनानिमित्त बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्यासंबंधीची जाहिरात ॲड-वे डिझाईन, पुणे/कोल्हापूर यांनी तयार केली व तद्‌नंतर सदर जाहिरात १२ निवडक मराठी दैनिक वर्तमानपत्रामध्ये प्रसिद्ध करण्यात आली. सदर जाहिरातीकरिता १२ वर्तमानपत्रांनी दिलेल्या जाहिरातीच्या देयकांची एकुण रक्कम रुपये रु.७,८३,२१६/- आणि जाहिरातीचे प्रारुपकर्ता (Creater of Advertisement) ॲड-वे डिझाईन, पुणे/कोल्हापूर यांचे रु.५९,०००/- असे एकूण रु.८,४२,२१६/- (अक्षरी रुपये आठ लक्ष बेचाळीस

हजार दोनशे सोळा फक्त) इतक्या खर्चाची देयके सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून अदा करण्यास या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे प्रशासकीय व कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

**(अ)**

| **अ.क्र.** | **दै. वर्तमानपत्राचे नाव** | **प्रकाशकाचे नाव** | **जाहिरात देयक रक्कम** |
|---|---|---|---|
| १ | तरुण भारत | श्री नरकेसरी प्रकाशन लि. | रु.३५,८६८/- |
| २ | आपलं महानगर | अक्षर कम्युनिकेशन | रु. ४८,२१६/- |
| ३ | दिव्य मराठी | डी.बी.कॉर्प लि. | |
| ४ | दिव्य मराठी | डी.बी.कॉर्प लि. | रु.९२,३१६/- |
| ५ | पुढारी | पुढारी पब्लिकेशन | रु.६४,०९२/- |
| ६ | लोकसत्ता | द इंडियन एक्सप्रेस प्रा.लि. | रु.७८,२०४/- |
| ७ | दै.सामना | प्रबोधन प्रकाशन प्रा.लि. | रु.६४,०९२/- |
| ८ | देशान्नती | विदर्भ पब्लिकेशन प्रा.लि. | रु.५९,३८८/- |
| ९ | सकाळ | सकाळ मिडीया प्रा.लि. | रु.१,६६,४०४/ |
| १० | महाराष्ट्र टाईम्स | बेनेट, कोलमन ॲण्ड कं.लि. | रु.७८,७९२/- |
| ११ | लोकमत | लोकमत मिडीया प्रा.लि. | रु.६३,५०४/- |
| १२ | पुण्यनगरी | श्री. अंबिका प्रिंटर्स ॲण्ड पब्लिकेशन | रु.३२,३४०/- |
| | | **(अ) एकूण** | **रु.७,८३,२१६/-** |

**(ब)**

| अ.क्र. | आस्थापना (जाहिरात प्रारुपकर्ता संस्था) नाव | देयकाची रक्कम |
|---|---|---|
| १ | ॲड-वे डिझाईन | रु.५९,०००/- |
| | **(ब) एकूण** | रु.५९,०००/- |
| | **एकूण (अ) +(ब)** | **रु.८,४२,२१६/-** |

**०३.** सदर देयकांचा खर्च या विभागाच्या “मागणी क्र.के-४, मुख्यलेखाशीर्ष २२३०-कामगार व सेवायोजन, ०१-कामगार, १११ कामगारांसाठी सामाजिक सुरक्षितता,राज्य योजनांतर्गत योजना (००) (१४) बाल कामगार प्रतिबंध अधिनियम,१९८६ (२२३०५८२८)” या लेखाशिर्षाखालील २६

जाहिरात व प्रसिद्धी या उद्दिष्टासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७६४/२०२२/व्यय-१६, दि.२५.०२.२०२२ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाचा, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग दोन यामधील अ.क्र.८, नियम क्र.१७(अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त नमूद देयकांबाबत कोणत्याही प्रकारचा विलंब न करता सदर देयके सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षात देय होतील याची दक्षता घ्यावी.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१११६५९३९३५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHAMRAOJI KAURTE

Digitally signed by RAJENDRA SHAMRAOJI KAURTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7CAA550613A8C4CB7C593368FAA24E20D6F8985F510118E6FC1AF8B04A443EE8, cn=RAJENDRA SHAMRAOJI KAURTE
Date: 2022.03.11 17:02:02 +05'30'

**( रा. शा. कौरते )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त (कामगार), कामगार आयुक्तालय,कामगार भवन, बांद्रा(पू.) मुंबई-५१.
८) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) उप सचिव (कामगार-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (कामगार-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.